कल्याण-डोंबिवली महानगरपालिका
प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम फेज-२ साठी
पदनिर्मितीबाबत....

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग

शासन निर्णय क्र. संकीर्ण ३००७/१७८३/प्र.क्र.१/नवि २२

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक :- १८ मार्च, २००८

**वाचा :-(१)** आयुक्त, कल्याण डोंबिवली महानगरपालिका, कल्याण यांचे पत्र क्र. सेवाप्र-१४०६/प्र.क्र. १९७०/साप्र.मुक/२००६ दिनांक १४/०८/२००७ व मनपा ठराव क्रमांक १०८ दि. १९.१०.२००५ आणि ठराव क्र. १०६ दिनांक १७/०८/२००५.

**(२)** संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/कल्याण डोंबिवली/पदनिर्मिती/ प्रस्ताव/कक्ष- १५/०७, दि. १७ ऑक्टोबर, २००७

**प्रस्तावना :**

कल्याण डोंबिवली महानगरपालिका कार्यक्षेत्रात यापूर्वी संयुक्त राष्ट्र लोकसंख्या निधि पुरस्कृत एकात्मिक लोकसंख्या व विकास प्रकल्प हा कार्यक्रम सन १९९९ ते २००५ या कालावधीत केंद्रशासनाच्या सहकार्याने राबविण्यात येत होता. हा कार्यक्रम राबविण्यासाठी विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन मानधनावर ५४ पदे भरली होती. तदनंतर ही योजना बंद झाल्यामुळे शासनाच्या निर्देशानुसार या कार्यक्रमासाठी कार्यरत पदांपैकी ५१ पदे या पदांवरील कर्मचारी यांचेसह केंद्रशासन पुरस्कृत प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम फेज-२ मध्ये समाविष्ट करण्यात आली. प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम या कार्यक्रमाची केंद्रशासनाचे अनुदानाची मुदत डिसेंबर २००७ मध्ये संपल्याने तदनंतर कार्यक्रम पुढे महानगरपालिका क्षेत्रात राबविणे आवश्यक असल्याने, या कर्मचा-यांना महानगरपालिका आस्थापनेवर सामावून घेण्यासाठी व आर.सी.एच. फेज-२ हा कार्यक्रम राबविण्यासाठी मनपा आस्थापनेवर विविध संवर्गातील ५१ पदे निर्माण करण्याचा ठराव क्र.१०८ दि. १९.१०.२००५ महानगरपालिकेने पारित केला आहे. त्यानुसार आयुक्त, कल्याण डोंबिवली महानगरपालिका यांनी संदर्भाधीन क्रमांक-१ येथे नमूद पत्रान्वये महानगरपालिकाच्या आस्थापनेवर आरोग्य सेवेसाठी विविध संवर्गातील नियमित ५१ पदांच्या निर्मितीचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे. जननी सुरक्षा योजना, तसेच माता व बाल मृत्यू दरांचे प्रमाण कमी करणे या दृष्टीने राज्याच्या शहरी भागातील सार्वजनिक आरोग्य व्यवस्थेमधील, प्रजनन व बाल आरोग्य या बाबींचे अनन्य साधारण महत्व विचारात घेवून, या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :--**

कल्याण डोंबिवली महानगरपालिका ठराव क्र.१०८, दि. १९.१०.२००५ अन्वये पारित विषयानुषंगाने आयुक्त, कल्याण डोंबिवली महानगरपालिका यांनी एकात्मिक लोकसंख्या व विकास -

प्रकल्पांतर्गत विहीत पध्दतीने नियुक्त केलेल्या आणि आर.सी.एच. फेज-२ अंतर्गत कार्यरत असलेल्या कर्मचा-यांना महानगरपालिका आस्थापनेवर सामावून घेण्यासाठी. आरोग्य सेवे अंतर्गत महानगरपालिका आस्थापनेवर विविध संवर्गातील ५१ पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

०२. आयुक्तांनी सादर केलेला प्रस्ताव व संचालक, आरोग्य सेवा यांचे अभिप्राय तसेच कल्याण डोंबिवली महानगरपालिका क्षेत्रात **"प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम"** नियमितपणे राबविण्यासाठी मनपा ठराव क्र. १०८ दि. १९.१०.२००५ विचारात घेवून मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ५१ (४) मधील तरतुदीस अधीन राहून पुढीलप्रमाणे ५१ पदांची निर्मिती करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (रुपये) | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १. | प्रकल्प व्यवस्थापक तथा आर.सी.एच. ऑफिसर | ३२५०-१४५-४७००-१७०-५५५० | १ |
| २. | वैद्यकिय अधिकारी | २३८०-१००-३३८०-१२५-४७५५ | ५ |
| ३. | सार्वजनिक आरोग्य परिचारिका | १८९०-७५-२६४०-८०-३४४०-८५-४०३५ | ५ |
| ४. | सहाय्यक परिचारिका प्रसविका | १४००-५५-१९५०-६०-२२५०-६५-३००५ | २५ |
| ५. | परिचारिका (स्टाफ नर्स) | १५७०-६५-२२२०-७०-२९२०-७५-३४४५ | ९ |
| ६. | प्रयोगशाळा तंत्रज्ञ | १५७०-६५-२२२०-७०-२९२०-७५-३४४५ | ३ |
| ७. | सांख्यिकी अधिकारी तथा लेखापाल | १८९०-७५-२६४०-८०-३४४०-८५-४०३५ | १ |
| ८. | डेटा एंट्री ऑपरेटर | १६७०-७०-२३७०-७५-३१२०-८०-३६८० | १ |
| ९. | ऑफिस असिस्टंट तथा मेसेंजर | १३४०-५०-१८४०-५५-२३९०-६०-२८१० | १ |
| | | एकूण | ५१ |

०३. सदर आदेशानुषंगाने सर्व संवैधानिक बाबींची पूर्तता आयुक्त, कल्याण डोंबिवली महानगरपालिका यांनी करुन शासनास पूर्तता अहवाल सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

**(सुनील कोठेकर)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा. मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.प्रधान सचिव, नगर विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
३. मा.प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
४. आयुक्त, कल्याण डोंबिवली महानगरपालिका, कल्याण.
५. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य भवन, सेंट जॉर्जेस रुग्णालय इमारत आवार, पी. डिमेलो रोड, मुंबई ०१.
६. निवडनस्ती (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.